**महावितरण कंपनीमार्फत प्रत्येक जिल्हयात सध्या सुरु असलेल्या तसेच मंजूर असलेल्या विकास कामांच्या प्रगतीबाबत स्थानिक लोकप्रतिनिधींना माहिती देण्यासाठी दर महिन्याला आढावा बैठक घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन परिपत्रक, क्रमांक :- संकीर्ण-२०१७/ प्र.क्र.४८४/ऊर्जा-२.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ०९ जून, २०१७.

**परिपत्रक**

महावितरण कंपनीमार्फत प्रत्येक जिल्हयात सध्या सुरु असलेल्या तसेच मंजूर असलेल्या विकास कामांच्या प्रगतीबाबतची माहिती जिल्ह्याचे मा. पालकमंत्री, जिल्ह्यात राहणारे इतर मा. मंत्री व सन्माननीय विधानमंडळ सदस्य यांना महावितरण कंपनीद्वारा जिल्हास्तरावरील आढावा बैठक आयोजित करुन दिली जात नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे.

२. उक्त परिस्थिती विचारात घेऊन शासनाने महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीमार्फत खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याच्या सूचना दिल्या आहेत :-

(अ) संबंधित जिल्हयाचे मा. पालकमंत्री, जिल्हयात राहणारे इतर मा. मंत्री व सन्माननीय विधानमंडळ सदस्य यांना माहिती देण्यासाठी जिल्हयातील अधीक्षक अभियंता, महावितरण कंपनी यांनी प्रत्येक महिन्याच्या कार्यालयीन कामकाजाच्या शेवटच्या दिवशी आढावा बैठक आयोजित करावी व सदर बैठकीमध्ये महावितरण कंपनीमार्फत प्रत्येक जिल्हयात सध्या सुरु असलेल्या तसेच मंजूर असलेल्या विकास कामांच्या प्रगतीबाबत त्यांना माहिती द्यावी.

(ब) उपरोक्त जिल्हास्तरीय आढावा बैठकांच्या नियमित आयोजनासंदर्भातील सनियंत्रणाची जबाबदारी संचालक (संचलन), महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांच्याकडे सोपविण्यात यावी.

३. वरील सूचनांनुसार अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या., मुंबई यांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व क्षेत्रीय अधिकाऱ्यांना परिपत्रकाव्दारे तात्काळ कळवावे व केलेल्या कार्यवाहीबाबतचा अहवाल शासनास सत्वर सादर करण्यात यावा.

४. हे शासन परिपत्रक, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०६०९१६०२५७८९१० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhimashankar Yallappa Manta

Digitally signed by Bhimashankar Yallappa Manta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries,Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=873ce9a279d9561ff0cbf658e05b823c67c79dcac309fc4ebdac035d6aeec2a0, cn=Bhimashankar Yallappa Manta
Date: 2017.06.09 17:01:39 +05'30'

**( भि. य. मंता )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी, प्रकाशगड, वांद्रे (पू), मुंबई-४०० ०५१.
२) सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री महोदय यांचे खाजगी सचिव.
३) सर्व सन्माननीय विधानसभा / विधानपरिषद सदस्य.
४) प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
५) उप सचिव (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) कक्ष अधिकारी (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२